अतिवृष्टी/पुरामुळे बाधित होऊन पुनर्वसित झालेल्या नांदेड जिल्ह्यातील उमरी तालुक्यातील नागरी सुविधा कामांसाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: एलएफडी-२०२४/प्र.क्र. २७/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २८ मार्च, २०२४

वाचा -

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एफएलडी-२०२३/प्र.क्र. ८७/र-१२, दि. ०८.११.२०२३

२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एफएलडी-२०२३/प्र.क्र. १०२/र-१२, दि. ०९.११.२०२३

३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, देगलूर जि. नांदेड यांचे पत्र जा.क्र./ काअ/ २०२३-२४/१११५, दि. २६.०३.२०२४

**प्रस्तावना-**

सन १९८३ मधील अतिवृष्टी/पुरामुळे बाधित होऊन पुनर्वसित झालेल्या मौजे बोळसा (ग.प.) भोगनाथ, मौजे बोळसा (ग.प.) (प), मनुर, कावलगुडा, इज्जतगाव बर्डी, इज्जतगाव पट्टी व इतर (ता. उमरी, जि. नांदेड) पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. १ व २ येथील शासन निर्णयांन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या कामांची देयके अदा करण्यासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड यांनी संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये निधी मागणी प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. त्यानुसार प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांकरिता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन १९८३ मधील अतिवृष्टी/पुरामुळे बाधित होऊन पुनर्वसित झालेल्या मौजे बोळसा (ग.प.) भोगनाथ, मौजे बोळसा (ग.प.) (प), मनुर, कावलगुडा, इज्जतगाव बर्डी, इज्जतगाव पट्टी व इतर (ता. उमरी, जि. नांदेड) पुनर्वसित गावठाणांतील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्याकरिता एकूण रूपये ११,४७,५०,०००/- (रूपये अकरा कोटी सत्तेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त) एवढा निधी सन २०२३-२०२४ या चालु वित्तीय वर्षात वितरित करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, सन १९८३ मधील अतिवृष्टी/पुरामुळे बाधित होऊन पुनर्वसित झालेल्या मौजे बोळसा (ग.प.) भोगनाथ, मौजे बोळसा (ग.प.) (प), मनुर, कावलगुडा, इज्जतगाव बर्डी, इज्जतगाव पट्टी व इतर (ता. उमरी, जि. नांदेड)

पुनर्वसित गावठाणांतील प्रगतीपथावरील पुढील तक्त्यात नमूद नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्याकरिता योजनेंतर्गत सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षात रूपये ११,४७,५०,०००/- (रूपये अकरा कोटी सत्तेचाळीस लक्ष पन्नास हजार फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे इत्यादि, १०१, अनुग्रह सहाय्य (९३) इतर, (९३)(०५) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणीपुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा इ. नागरी सुविधा यांवरील खर्च (अनिवार्य) (२२४५ ०९८८) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांच्यामार्फत संबंधित कार्यान्वयन यंत्रणा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड यांना खालील अटींच्या अधीन राहून उपलब्ध करून देण्यात येत आहे-

(रक्कम रूपयात)

| अ. क्र. | पुनर्वसित नवीन गावठाण | नागरी सुविधा कामांचा तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम | यापूर्वी वितरित एकूण निधी | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | बोळसा (ग.प.) भोगनाथ ता. उमरी जि. नांदेड | मुख्य रस्त्यापासून गावापर्यंत सी. सी. रस्ते बांधकाम | २,००,००,०००/- | निरंक | १,८०,००,०००/- |
| २ | बोळसा (ग.प.) भोगनाथ ता. उमरी जि. नांदेड | समाज मंदिर बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ३ | बोळसा (ग.प.) (प) ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते व नाली बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ४ | मनुर ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते व नाली बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ५ | कावलगुडा ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते व नाली बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ६ | इज्जतगाव बर्डी ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ७ | इज्जतगाव पट्टी ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ८ | इज्जतगाव आबादी ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते व नाली बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ९ | मनुर ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते व नाली बांधकाम | ७५,००,०००/- | निरंक | ६७,५०,०००/- |
| १० | इज्जतगाव ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते व नाली बांधकाम | १,००,००,०००/- | निरंक | ९०,००,०००/- |
| ११ | कावलगुडा खु. ता. उमरी जि. नांदेड | अंतर्गत सी. सी. रस्ते व नाली बांधकाम | २,००,००,०००/- | निरंक | १,८०,००,०००/- |
| | | | **एकूण-** | | **११,४७,५०,०००/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर तसेच जिल्हाधिकारी, नांदेड यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

५) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

८) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

९) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate) महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१०) या संदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२३-२०२४ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत

शासनास सादर करावा.

३. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय, भाग-२, दि. १७.०४.२०१५ मधील वित्तीय नियमावली भाग पहिला उपविभाग तीन परिच्छेद क्र. २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३२८१७१५२१७९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2024.03.28 17:24:38 +05'30'

**( संजय जगताप )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर
२) उप आयुक्त (पुनर्वसन), छत्रपती संभाजीनगर
३) जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, नांदेड
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
६) महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भोकर जि. नांदेड
९) वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय,मुंबई-३२.
१०) नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
११) महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१२) महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय,मुंबई ३२.
१३) निवडनस्ती कार्यासन र-१२,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२